**पदोन्नती आदेश रद्द करणेबाबत**
**श्री.प्रमोद अभिरामजी गुजरकर**
**उप विभागीय अधिकारी (स्थापत्य)**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२९७/सेवा-२

मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक : २.१२.२०१६

**वाचा -**

१) शासन आदेश क्रमांक- पीओजी-२०१६/प्र.क्र.११८ /सेवा-२ दिनांक:- २९.७.२०१६

उपरोक्त संदर्भीय दिनांक २९.७.२०१६ च्या पदोन्नती आदेशान्वये श्री. प्रमोद अभिरामजी गुजरकर यांना पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नती देवून त्यांची पदस्थापना मुंबई (कोकण) प्रादेशिक विभागांतर्गत सा.बां.उप विभाग, मंडणगड येथे करण्यात आलेली होती.

२. श्री. प्रमोद अभिरामजी गुजरकर अद्यापही त्यांच्या पदोन्नतीने देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झालेले नाहीत. श्री.गुजरकर यांच्या पदोन्नती आदेशामध्ये, संबंधित मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग/अधीक्षक अभियंता,सा.बां.मंडळ यांना अशी विनंती करण्यात आली होती की, त्यांच्याकडे नियुक्त असलेल्या संबंधीत पदविकाधारक कनिष्ठ अभियंता यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

३. त्याचप्रमाणे श्री.गुजरकर यांच्या पदोन्नती आदेशामध्ये असेही नमूद करण्यात आले होते की, जर ते दिनांक २९.८.२०१६ पर्यंत पदोन्नतीनंतर देण्यात आलेल्या सविस्तर नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन त्यांच्या पदोन्नतीचे आदेश कसलीही नोटीस न देता रद्द करण्यात येतील. याबाबत नंतर कोणत्याही अभिवेदनाचा विचार केला जाणार नाही.

४. श्री.गुजरकर यांच्या पदोन्नती आदेशात वरील बाबी स्पष्टपणे नमूद करण्यात आल्या असताना देखील ते त्यांच्या पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू झालेले नाहीत. त्यामुळे श्री.गुजरकर यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे दिसून येते. संबंधीत पदोन्नतीचे पद हे गट-अ चे वरिष्ठ पद असून, सदर पद अनिश्चित कालावधीसाठी रिक्त राहिल्याने संबंधीत आस्थापनेच्या कामकाजावर होणारा विपरित परिणाम लक्षात घेता, सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री. प्रमोद अभिरामजी गुजरकर यांना दिनांक २९.७.२०१६ च्या आदेशान्वये उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर देण्यात आलेली पदोन्नती या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३११०२४६८९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2016.12.03 11:05:00 +05'30'

**( अ. ज. कांबळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
२) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
३) अधीक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक
४) श्री. प्रमोद अभिरामजी गुजरकर, पदविकाधारक कनिष्ठ द्वारा संबंधीत मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग यांचेमार्फत
५) मा.मंत्री (सा.बां) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
६) मा.राज्यमंत्री (सा.बां) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन आस्था-१ / आस्था-३/ सेवा-३, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०) कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई